**महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा**
**गट -अ नामनिर्देशनाने नियुक्तीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्र.निमंप-२०१०/प्र.क्र.९ (१६१)/सेवा-३**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक :- २९ एप्रिल,२०११.**

**वाचा :- १) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र. मवैअ-१००७/प्र.क्र.३७५ /सेवा/३, दि. १०.०६.२००९**
**२) शासन निर्णय , सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र. मवैअ-१००७/प्र.क्र.२८८ /सेवा-३, दिनांक ३१.०८.२००७**
**३) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र.निमंप-२०१०/प्र.क्र.९ (१६१)/सेवा-३ दिनांक :- १९ जानेवारी, २०११.**

**प्रस्तावाना :-**

डॉ. ओमप्रकाश गिऱ्हेपुंजे हे सामान्य रुग्णालय, भंडारा येथे अस्थायी वैद्यकीय अधिकारी म्हणून दि.१३/०४/०९ ते दि.१२/०३/१० या कालावधीत कार्यरत असतांना दि. १६/१/१० रोजी रु.५०००/- ची लाच घेताना ॲन्टी करप्शन ब्युरो मार्फत सापळा रचून पकडले होते व त्याचे विरुध्द अपराध क्र.४/१० दाखल झाल्याचे निदर्शनास आल्याने त्यांना निवडमंडळामार्फत शिफारसीनंतर देण्यात आलेली नियुक्ती रदद करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा गट -अ (वेतनश्रेणी रु.१५६००-३९१०० + ग्रेड पे ५४००) या संवर्गात वैद्यकीय अधिकारी गट अ या पदावर नामनिर्देशनाने नियुक्ती करण्यासाठी या विभागाच्या अंतर्गत संदर्भ क्र. १ व २ च्या आदेशान्वये स्थापन केलेल्या स्वतंत्र निवड मंडळाने महाराष्ट्र ज्ञान महामंडळामार्फत निवड चाचणी परिक्षा घेतली होती. या परीक्षेच्या अनुषंगाने जाहिर केलेल्या प्रवर्गनिहाय निकालानूसार पात्र ठरलेल्या डॉ. गि-हेपुंजे ओमप्रकाश पुरुषोत्तम, यांची शिफारस उक्त पदावर नियुक्तीसाठी करण्यात आली

आहे. त्यानुसार संदर्भ क्र. ३ वरील आदेशान्वये त्यांची नियुक्ती ग्रामीण रुग्णालय, मोहाडी, जिल्हा भंडारा येथे वैद्यकीय अधिकारी या पदावर तात्पूरत्या स्वरुपात करण्यात आली होती. शासन या आदेशान्वये डॉ. गि-हेपुंजे ओमप्रकाश पुरुषोत्तम यांचेविरुध्द लाच प्रकरणी गुन्हा दाखल झालेला असल्याने त्यांचे संदर्भ क्र.३ वरील नियुक्तीचे आदेश या आदेशान्वये तात्काळ रदद करीत आहे.

सदरचे आदेश www.maharashtra.gov.in वर साकेतांक क्र. २०११०४२९१६५५६११०१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यापाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(राजेंद्र पवार)
**शासनाचे अवर सचिव**

प्रति,

विभागीय आयुक्त, नागपूर
संचालक, आरोग्य सेवा, मुंबई
सहसंचालक (प्रशासन व अर्थसंकल्प), आरोग्य सेवा, मुंबई
उपसंचालक, आरोग्य सेवा, नागपूर
जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद,भंडारा
जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय,भंडारा
वैद्यकीय अधिक्षक ग्रामीण रुग्णालय, मोहाडी, जि.भंडारा.
महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखापरिक्षा/ लेखा अनुज्ञेयता) मुंबई /नागपूर
जिल्हा कोषागार अधिकारी, भंडारा
संबंधित वैद्यकीय अधिकारी, पत्ताः-डॉ.गिऱ्हेपुजे ओमप्रकाश पुरुषोत्तम द्वारा- ओम मॅटर्निटी हॉस्पीटल, साई मंदिर जवळ, तकीया वार्ड, जिल्हा परिषद रोड,ता. जि. भंडारा-४४१९०४
निवडनस्ती, सेवा-३ (निवड मंडळ)